**शासकीय, स्थानिक स्वराज्य संस्थाच्या तसेच खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक शाळातील व अध्यापक विद्यालयातील पूर्ण वेळ शिक्षकांच्या वरिष्ठ (Senior Grade) व निवड श्रेणीसाठी (selection Grade) आवश्यक प्रशिक्षणाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शिप्रधो २०१८/प्र.क्र. ७२/१८/प्रशिक्षण.**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २१ डिसेंबर, २०१८

वाचा -

१. शासन निर्णय क्र. पीआरई २००६/(५१५१/०६) प्रशि - १ दि. २ डिसेंबर, २००६
२. शासन निर्णय क्रमांक : राप्रधो - ४२१७ प्र.क्र. ३२/२०१७/प्रशिक्षण, दि. ८ जून २०१७
३. शासन निर्णय क्र. शिप्रधो - २२१७/प्र.क्र.३९/२०१७/प्रशिक्षण दि. २३ ऑक्टोबर, २०१७.

**प्रस्तावना:**

बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाधिकार अधिनियम, २००९ नुसार ६ ते १४ वयोगटातील सर्व मुलांना सक्तीचे व मोफत गुणवत्तापूर्ण शिक्षण मिळणे गरजेचे असून हे शिक्षण देण्याची जबाबदारी विभागातील सर्व घटकांची आहे. राज्यातील १०० टक्के मूले शिकण्याच्या दृष्टीने शासन पातळीवर विविध शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहेत, त्यानुसार दिनांक ८ जून, २०१७ व दिनांक २३ आक्टोंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदी प्रमाणे सर्व शिक्षक प्रशिक्षित होण्यासाठी महाराष्ट्र विद्या प्राधिकरणा मार्फत विविध प्रकारची प्रशिक्षणे आयोजित केली जातात.

सदर शासन निर्णयान्वये राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थेच्या तसेच खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, व उच्च माध्यमिक शाळा व अध्यापक विद्यालयातील पूर्णवेळ शिक्षकांना त्यांच्या सेवेमध्ये वरिष्ठ व निवड श्रेणी लागू करण्यासाठी सेवांतर्गत प्रशिक्षणाच्या सुधारित कार्यपध्दतीस मान्यता दिलेली आहे. तथापि स्थानिक स्वराज्य संस्थेच्या तसेच खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील पूर्णवेळ शिक्षकांच्या वरिष्ठ व निवड वेतनश्रेणीसाठी प्रशिक्षणांचा कालावधी निश्चित करून ती “प्रशिक्षणे” ग्राह्य धरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थेच्या तसेच खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, व उच्च माध्यमिक शाळा व अध्यापक विद्यालयातील पूर्णवेळ शिक्षकांना त्यांच्या सेवेमध्ये वरिष्ठ व निवड श्रेणी लागू करण्यासाठी खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

१. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे प्रतिवर्षी सर्व शिक्षा अभियान, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान,अंतर्गत तसेच विद्या प्राधिकरण मार्फत आयोजित खाली नमूद प्रशिक्षणे शैक्षणिक वर्ष २०१७-१८ (मे, २०१८) पर्यंत वरिष्ठ व निवड श्रेणीसाठी ग्राह्य येतील.

अ) **प्राथमिक शिक्षकांसाठी**

| **अ.क्र.** | **प्रशिक्षणाचे नाव** | **प्रशिक्षक वरिष्ठ(१२ वर्ष)/निवड श्रेणी (२४ वर्ष)** |
|---|---|---|
| १. | भाषा- मुलभूत क्षमता वाचन कार्यक्रम | राज्यस्तरीय तज्ञ मार्गदर्शकसाठी (१२/२४) साठी ग्राह्य |
| २. | गणित संबोध विकासन | राज्यस्तरीय तज्ञ मार्गदर्शक (१२/२४) साठी ग्राह्य |
| ३. | तेजस प्रशिक्षण | राज्यस्तरीय तज्ञ मार्गदर्शक (१२/२४) साठी ग्राह्य |

ब) **माध्यमिक शिक्षकांसाठी**

| **अ.क्र.** | **प्रशिक्षणाचे नाव** | **प्रशिक्षक वरिष्ठ(१२ वर्ष)/निवड श्रेणी (२४ वर्ष)** |
|---|---|---|
| १. | अविरत -१ | १० दिवसांचे प्रशिक्षण लेव्हल १ फक्त वरिष्ठ श्रेणीसाठी |
| २. | CHESS | राज्यस्तरीय तज्ञ मार्गदर्शक (१२/२४) साठी ग्राह्य |
| ३ | आय आय टी चे गणित प्रशिक्षण | राज्यस्तरीय तज्ञ मार्गदर्शक (१२/२४) साठी ग्राह्य |
| ४ | न्यासचे विज्ञान प्रशिक्षण | राज्यस्तरीय तज्ञ मार्गदर्शक (१२/२४) साठी ग्राह्य |

२. राज्य मंडळ, पुणे यांनी माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षकांच्या वरिष्ठ व निवड वेतन श्रेणीसाठी शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पर्यंत ज्या शिक्षकांनी सेवांतर्गत प्रशिक्षणे घेतली आहेत व समाधानकारकरीत्या प्रशिक्षण पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र प्राप्त झाले आहेत. या शिक्षकांचे प्रशिक्षण वरिष्ठ व निवड वेतन श्रेणीसाठी ग्राह्य धरावीत.

३. **सन २०१८-१९ या वर्षापासून वरिष्ठश्रेणी करिता (१२ वर्ष) १० दिवसांचे प्रशिक्षण व निवडश्रेणी करिता (२४ वर्ष) प्रत्येक वर्षी १० दिवसांचे प्रशिक्षण याप्रमाणे सलग ४ वर्षात ४० दिवसांचे प्रशिक्षण पूर्ण केलेले असल्यास ते ग्राहय धरण्यात येईल.** सदर १० दिवसाचे प्रशिक्षण हे शिक्षकांना ज्या वर्षात १२ वर्ष पूर्ण होणार आहेत त्या पूर्वीच्या कोणत्याही ३ पैकी २ वर्षात पूर्ण केलेली असावी, तसेच ४० दिवसांचे प्रशिक्षण हे शिक्षकांना ज्या वर्षी २४ वर्ष पूर्ण होणार आहेत त्या पूर्वीच्या ५ वर्षापैकी ४ वर्षात पूर्ण केलेले असावे.

४. वरिष्ठ / निवड श्रेणीचा (१२/२४ वर्षाचा) लाभ मिळण्यासाठी शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या आदेशामधील तरतूदी देखील लागू राहतील.

५. केवळ वरिष्ठ अथवा निवडश्रेणी करिता विद्या प्राधिकरणातर्फे अथवा राज्य मंडळातर्फे यापुढे वेगळयाने अथवा स्वतंत्र प्रशिक्षणाचे आयोजन करण्यात येऊ नये. महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषदे मार्फत (विद्या प्राधिकरण) प्रत्येक वर्षी समग्र शिक्षा अभियान (स. शि.अ/ रा. मा.शि.अ.) अंतर्गत जी प्रशिक्षणे, आयोजित करण्यात येतील, या प्रशिक्षणांचा एकत्रित रित्या उपरोक्त परिच्छेद क्र. ३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कालावधी पूर्ण केल्यास सदर प्रशिक्षणे ही वरिष्ठ व निवड श्रेणीसाठी ग्राह्य धरण्यात यावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२११५३५३५१७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2018.12.21 15:39:33 +05'30'

(बी. आर.माळी)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री
२. मा. मंत्री शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालय, मुंबई
४. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
६. महालेखापाल (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र , मुंबई/ नागपूर
७. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
९. सह सचिव / उपसचिव / शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.शिक्षण संचालक, (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११.शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे

१२.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र (महाराष्ट्र विद्या प्राधिकरण), पुणे

१३.आयुक्त, महानगरपालिका (सर्व)

१४.संचालक, लेखा व कोषागरे नवीन प्रशासन भवन मुंबई.

१५.विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व विभाग)

१६.शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक / निरंतर ), जिल्हा परिषद (सर्व)

१७.शिक्षण निरीक्षक, (दक्षिण / उत्तर / पश्चिम), बृहन्मुंबई

१८. शिक्षण प्रमुख / शिक्षणाधिकरी/ प्रशासन अधिाकरी, महानगरपालिका (सर्व)

१९.निवड नस्ती (प्रशिक्षण)